एकात्मिक बाल विकास सेवा योजनेचे बळकटीकरण व पोषण सुधारणा कार्यक्रम (ISSNIP-World Bank) अंतर्गत राबविण्यात येणाऱ्या विविध उपक्रमाचा आढावा घेण्यासाठी (State Steering Committee) तसेच (State Core Team) गठीत करण्यास मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०१७/प्र.क्र.११५/का.६**

नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ७ एप्रिल, २०१७

वाचा :-१) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.एबावि-२०१४/प्र.क्र.६८/का.६, दिनांक ३० एप्रिल, २०१४

२) महिला व बाल विकास विभाग,शासन निर्णय क्र.एबावि-२०१४/प्र.क्र.२५७/का.६, दिनांक १२ नोव्हेंबर, २०१४

३) महिला व बाल विकास विभाग,भारत सरकार यांनी निर्गमित केलेल्या २०१५ मार्गदर्शक सूचना

४) केंद्र शासनाचे पत्र क्र.F.No.१०-१/२०१३-WBP, दिनांक १८ मार्च, २०१६

५) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई यांचे पत्र क्रमांक एबाविसेयो/नमुंबई/का-७/ISSNIP/रासुसग/२०१६-१७/३०, दिनांक १७/०२/२०१७

६) महिला व बाल विकास विभाग शासन निर्णय क्र.एबावि-२०१७/प्र.क्र.०६/का.६, दिनांक २२ फेब्रुवारी, २०१७

**प्रस्तावना :-** केंद्र शासनाने जागतिक बँकेच्या सहाय्याने अंमलात आणलेली एकात्मिक बाल विकास सेवा योजनेचे बळकटीकरण व पोषण सुधारणा प्रकल्प या योजनेची राज्यातील २० जिल्हयात ३१७ प्रकल्पात एकुण ६०१३२ अंगणवाडी केंद्रात अंमलबजावणी सुरु करण्यास दिनांक ३० एप्रिल २०१४ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. केंद्र शासनाने जागतिक बँक प्रकल्प, एकात्मिक बाल विकास सेवा योजना बळकटीकरण व पोषण सुधारणा प्रकल्पाची पुनर्रचना मार्च-२०१६ मध्ये केलेली आहे. त्यानुसार पुर्वी केंद्र हिस्सा ९०% व राज्य हिस्सा १०% असे निधीचे प्रमाण होते. त्यामध्ये बदल करुन केंद्र हिस्सा ८८% व राज्य हिस्सा १२% असे निधीचे प्रमाण करण्यात आलेले आहे. तसेच पुर्वीच्या कार्यक्रमात देखील बदल केलेला आहे.

२. केंद्र शासनाने दिनांक १८ मार्च २०१६ च्या पत्रान्वये (ISSNIP World Bank) कार्यक्रमातंर्गत DLI-१, DLI-२, व DLI-३, व DLI-४ हे उपक्रम राज्यात राबविण्यास मंजूरी दिलेली आहे. एकात्मिक बाल विकास सेवा योजनेचे बळकटीकरण व पोषण सुधारणा प्रकल्प (ISSNIP-World Bank) कार्यक्रमाअंतर्गत ICT-RTM (Information Communication Technology Enable Real-time Monitoring) ची अंमलबजावणी करण्यासाठी केंद्र शासनाने त्यांच्या दिनांक १८/०३/२०१६ च्या पत्रान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान केलेली आहे. सदर उपक्रम राबविण्यासाठी रुपये ९७.४३ कोटी इतका खर्च येणार असून केंद्र शासनाकडून ८८% म्हणजे रुपये ८५.७४ कोटी व राज्य हिस्सा १२% म्हणजे रुपये ११.६९ कोटी इतका निधी या कामासाठी उपलब्ध होणार आहे.

३. केंद्र शासनाने दिनांक १८ मार्च, २०१६ च्या पत्रान्वये (ISSNIP World Bank) घोषित केलेले कार्यक्रम DLI-१, DLI-२, व DLI-३, व DLI-४ हे राज्यात राबविण्यासाठी तसेच एकात्मिक बाल विकास सेवा योजनेचे बळकटीकरण व पोषण सुधारणा कार्यक्रम (ISSNIP-World Bank) अंतर्गत राबविण्यात येणाऱ्या विविध उपक्रमाचा आढावा घेण्यासाठी (State Steering Committee) राज्यस्तरीय सुकाणू समिती तसेच (State Core Team) राज्यस्तरीय गाभा समिती गठीत करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-** केंद्र शासनाने दिनांक १८ मार्च, २०१६ च्या पत्रान्वये (ISSNIP World Bank) घोषित केलेले उपक्रम DLI-१, DLI-२, व DLI-३, व DLI-४ हे राज्यात राबविण्यासाठी तसेच एकात्मिक बाल विकास सेवा योजनेचे बळकटीकरण व पोषण सुधारणा प्रकल्प (ISSNIP-World Bank) कार्यक्रमाअंतर्गत ICT-RTM (Information Communication Technology Enable Real-time Monitoring) ची अंमलबजावणी करण्यासाठी राज्यस्तरीय सुकाणू समिती (State Steering Committee) तसेच राज्यस्तरीय गाभा समिती (State Core Team) गठीत करण्यास शासन मान्यता देत आहे. राज्यस्तरीय सुकाणू समिती (State Steering Committee) तसेच राज्यस्तरीय गाभा समिती (State Core Team) ची रचना खालीलप्रमाणे असेल.

**राज्यस्तरीय सुकाणु समिती**

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे पदनाम | समितीवरील पदनाम |
|---|---|---|
| १ | सचिव, महिला व बाल विकास विभाग | अध्यक्ष |
| २ | आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई | सदस्य |
| ३ | NIC चे राज्यस्तरीय अधिकारी | सदस्य |
| ४ | संचालक, माहिती तंत्रज्ञान विभाग | सदस्य |
| ५ | संचालक, राज्य कौशल्य विकास अभियान | सदस्य |
| ६ | संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान (NHM) | सदस्य |
| ७ | राज्य सह प्रकल्प समन्वयक (ISSNIP) | सदस्य सचिव |

**राज्यस्तरीय गाभा समिती**

| अ.क्र. | अधिका-याचे पदनाम |
|---|---|
| १ | नोडल अधिकारी ICT RTM (राज्य सह प्रकल्प समन्वयक) |
| २ | कार्यक्रम व्यवस्थापक |
| ३ | प्रशिक्षण समन्वयक |
| ४ | खरेदी समन्वयक |

२. केंद्र शासनाने दिनांक १८ मार्च, २०१६ च्या पत्रान्वये (ISSNIP World Bank) घोषित केलेले उपक्रम DLI-१, DLI-२, व DLI-३, व DLI-४ ची राज्यात अंमलबजावणी करण्यासाठी तसेच एकात्मिक बाल विकास सेवा योजनेचे बळकटीकरण व पोषण सुधारणा (ISSNIP-World Bank) कार्यक्रमाअंतर्गत ICT-RTM (Information Communication Technology Enable Real-time Monitoring) ची अंमलबजावणी करण्यासाठी राज्यस्तरीय सुकाणू समिती तसेच राज्यस्तरीय गाभा समिती कार्यरत राहील.

३. जागतिक बँक सहाय्यित एकात्मिक बाल विकास सेवा योजनेचे बळकटीकरण व पोषण सुधारणा प्रकल्पाअंतर्गत राज्यस्तरीय व जिल्हास्तरीय कार्यालयाकरीता विविध प्रकारचे साहित्य

खरेदीसाठी दिनांक १२ नोव्हेंबर, २०१४ च्या शासन निर्णयान्वये गठीत केलेली खरेदी समिती या शासन निर्णयान्वये अधिक्रमित करण्यात येत असून राज्यस्तरीय सुकाणू समितीने सदर उपक्रमाच्या अनुषंगाने मान्य केलेले सर्व खरेदीविषयक प्रस्ताव दिनांक २२ फेब्रुवारी, २०१७ च्या शासन निर्णयान्वये विभागासाठी गठीत केलेल्या राज्यस्तरीय खरेदी समितीसमोर शासन निर्णयातील तरतुदींचे पालन करुन राज्य सह प्रकल्प समन्वयक (ISSNIP) यांनी सादर करुन त्यास समितीची मान्यता घ्यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४०७१२५४५८६३३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Lalsing Ramchandra Gujar

Digitally signed by Lalsing Ramchandra Gujar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3eb5f6c3e4855c5793924cf2a352b44266d360de02a2494e1a64477bf79d694, cn=Lalsing Ramchandra Gujar
Date: 2017.04.10 15:27:04 +05'30'

**(ला. रा. गुजर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मंत्री / मा. राज्यमंत्री (महिला व बाल विकास), मंत्रालय, मुंबई
२) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई
३) आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे
४) राज्य प्रकल्प समन्वयक, जागतिक बँक प्रकल्प, एकात्मिक बाल विकास सेवा योजना बळकटीकरण व पोषण सुधारणा प्रकल्प, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई
५) NIC चे राज्यस्तरीय अधिकारी, मंत्रालय, मुंबई
६) संचालक, माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई
७) संचालक, राज्य कौशल्य विकास अभियान,
८) संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान (NHM)
९) राज्य सह प्रकल्प समन्वयक, जागतिक बँक प्रकल्प, एकात्मिक बाल विकास सेवा योजना बळकटीकरण व पोषण सुधारणा प्रकल्प, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई
१०) सर्व जिल्हाधिकारी
११) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
१२) सर्व विभागीय उपायुक्त, महिला व बाल विकास विभाग
१३) सर्व महिला व बाल विकास अधिकारी, जिल्हा परिषद
१४) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र -१, मुंबई
१५) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-१, मुंबई
१६) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र -१, मुंबई
१७) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर
१८) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१९) कक्ष अधिकारी (का.४) महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
२०) वित्त विभाग,(व्यय-६) मंत्रालय, मुंबई
२१) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
२२) महिला व बाल विकास विभागातील सर्व कार्यासने
२३) निवड नस्ती (कार्यासन ६)